**राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय शालेय,महिला, ग्रामीण व इतर क्रीडा स्पर्धेत सहभागी होणाऱ्या खेळाडूंना क्रीडा नैपुण्य शिष्यवृत्ती करिता निधी वितरित करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## शालेय शिक्षण व क्रीडा विभाग

## शासन निर्णय क्रमांक : निविप्र ४०१६ /प्र.क्र ६६ /क्रीयुसे -२

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख : २२ जून, २०१७

**वाचा**

१. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्रमांक राक्रीधो २०१२ / प्र.क्र.१४५ /१२ /क्रीयुसे - २, दि.०४.०७.२०१३.
२. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्रमांक अताप्र-१००८ / प्र.क्र.४२८ /१२ /क्रीयुसे - २, दि.२२.०३.२०१०
३. वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं - २०१७ / प्र.क्र ७५ / अर्थ-३ ,दि.१८.०४.२०१७ .
४. क्रीडा व युवक सेवा पुणे यांचे पत्र क्रमांक.क्रीयुसे /क्रीडानैशि /निवि /२०१७-१८/२/का-४, दि.२९.०४.२०१७.

**प्रस्तावना -**

राज्यात तालुका ते राष्ट्रीय स्तरावर भारतीय शालेय खेळ महासंघ यांच्या वतीने शालेय क्रीडा स्पर्धा, तसेच भारतीय क्रीडा प्राधिकरणाच्या महिला व ग्रामीण (पायका) क्रीडा स्पर्धा यांचे आयोजन क्रीडा व युवक सेवा संचालनालयद्वारे करण्यात येते. उपरोक्त संदर्भाधीन क्र.०४ च्या पत्रान्वये सन २०१६-१७ व २०१७-१८ या वर्षातील सहभागी व प्राविण्य प्राप्त खेळाडूंना शिष्यवृत्ती देण्याकरीता निधी वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनास सादर करण्यात आला होता. त्या अनुषंगाने या योजनेत सन २०१७-१८ मध्ये अनुदानाच्या वितरणास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०१७-१८ या वर्षाकरीता राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय शालेय,महिला,ग्रामीण व इतर क्रीडा स्पर्धेत सहभागी होणाऱ्या खेळाडूंना क्रीडा नैपुण्य शिष्यवृत्ती देण्याकरिता ₹ .३००.०० लक्ष निधी अर्थसंकल्पित आहे. त्यापैकी सन २०१६-१७ या वर्षात सहभागी/प्राविण्यप्राप्त खेळाडूंना शिष्यवृत्ती देण्याकरिता रु. १,३५,६०,२००/-इतकी तरतूद वितरित करण्यास व सदर रक्कम आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांच्या अधिनस्त ठेवण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त संदर्भात होणारा खर्च "मागणी क्रमांक: ई-३, २२०४- क्रीडा व युवक सेवा १०४ क्रीडा व खेळ (०९) खेळाडूंना शिष्यवृत्त्या व पुरस्कार (०९) (०१) क्रीडा नैपुण्य शिष्यवृत्त्या (२२०४-१६६७)” या लेखाशिर्षाखालील मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा. सदरचे अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहेत त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे.

३. सदर योजनेअंतर्गत खेळाडूंना शिष्यवृत्ती मंजूर करतांना संदर्भाधीन क्र.२ च्या शासन निर्णयामधील परिच्छेद क्र.३ मधील अटी व शर्ती लागू राहतील.

४. वित्त विभागाच्या दि.२०/०७/२०१५ च्या शासन परिपत्रकानुसार खालील बाबी नमूद करण्यात येत आहेत.

४.१. वित्त विभागाच्या दि.१८/०४/२०१७ च्या शासन परिपत्रकान्वये निधी वितरणाचे अधिकार विभागास आहेत.

४.२. यापूर्वी वितरीत केलेल्या अनुदानापैकी ७५% पेक्षा अधिक खर्च झाला आहे.

४.३. ज्या लेखाशिर्षाखाली अनुदान वितरीत करण्यात येत आहे त्या लेखाशिर्षातंर्गत गतवर्षापूर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही.

४.४. दि.२४/०७/२०१५ च्या आदेशातील इतर मुद्दे या आदेशास लागू नाहीत.

४.५. परिपत्रकातील “अ” व “ब” ची पूर्तता होत आहे.

५. वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि.१८/०४/२०१७ व दि.२४/०७/२०१५ च्या परिपत्रकातील सूचनानूसार उपरोक्त तरतूद खर्च करण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी. यासाठी संबंधित जिल्हा क्रीडा अधिकारी यांना आंहरण व संवितरण अधिकारी तर आयुक्त (क्रीडा )यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि.२०/०४/२०१६ च्या परिपत्रकातील सूचनांना अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे. सदर परिपत्रकाच्या परिशिष्टातील परिच्छेद ७ ते १८ मधील अटींची तसेच परिपत्रकाच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ९ मध्ये नमूद अटींची पूर्तता होत आहे. सदर परिपत्रकाच्या परिशिष्टातील मुद्दा क्र. १,२,३,४,५,६,७ व ८ मधील बाबी सदर आदेशास लागू नाहीत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०६२२१४५७१३३७२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Deepak Vijay Shelar

Digitally signed by Deepak Vijay Shelar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8e3feac5acb11ae3d9464a8a336d7067314e8f58b632fcbb7b5b4cf900c4649b, cn=Deepak Vijay Shelar
Date: 2017.06.22 14:54:07 +05'30'

**( दिपक शेलार)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा.मंत्री (शालेय शिक्षण व क्रीडा )यांचे खाजगी सचिव

२) मा.प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.

३) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे.
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
५) महालेखापाल (लेखा व परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
६) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, (क्रीडा संचालनालयामार्फत).
७) सर्व उप संचालक, क्रीडा व युवक सेवा, (क्रीडा संचालनालयामार्फत).
८) सर्व जिल्हा क्रीडा अधिकारी, ( क्रीडा संचालनालयामार्फत)
९) वित्त विभाग (व्यय-५), मंत्रालय, मुंबई.
१०) निवडनस्ती, क्रीयुसे-२